महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळावर
नामनिर्देशनाने नियुक्ती करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक कृबास-०१२५/प्र.क्र.१०६/२१स,**
मादाम कामा मार्ग , हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई ४०००३२.
दिनांक: २६ मार्च, २०२५.

**वाचा-** १. महाराष्ट्र कृषी उत्पन्न पणन (विकास व विनियमन) अधिनियम,१९६३.
२. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे यांचे पत्र क्र.कृपमं/प्रशासन संचालक नियुक्ती/७४८/२०२५ दि.२६.०३.२०२५.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र कृषि उत्पन्न पणन (विकास व विनियमन) अधिनियम, १९६३ च्या कलम ३९(ब) मध्ये महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळावर राज्यातील बाजार समित्यांच्या सभापती मधून प्रत्येक महसूल विभागातून एक सदस्य या प्रमाणे ६ सदस्यांची नामनिर्देशनाने नियुक्ती करण्याची तरतूद आहे. त्याअनुषंगाने नाशिक महसूली विभागातून कृषि उत्पन्न बाजार समिती, दोंडाईचा, जि.धुळे या बाजार समितीचे सभापती श्री.नारायण बाजीराव पाटील यांची महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळावर नामनिर्देशित सदस्य म्हणून नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र कृषि उत्पन्न पणन (विकास व विनियमन) अधिनियम, १९६३ च्या कलम ३९(ब) नुसार महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळावर सदस्य म्हणून नाशिक महसूली विभागातून कृषि उत्पन्न बाजार समिती, दोंडाईचा, जि.धुळे या बाजार समितीचे सभापती श्री.नारायण बाजीराव पाटील यांची नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. श्री. नारायण बाजीराव पाटील हे शासन निर्णयाच्या दिनांकापासून महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळावर सदस्य म्हणून कामकाज पाहण्यास पात्र असतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३२६१८४८५२१५०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MADHAVI SANDEEP SHINDE

Digitally signed by MADHAVI SANDEEP SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT,
2.5.4.20=020531e249e88fe74bf6db805f42944e7f29bc0ba6134c83c1f183b8cc27f2ff, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=4CB1CBBD6A4EE442FDAA6C1B358BF61FEAF9AEFC16E8F39E9EE1D06B9E8A7A59, cn=MADHAVI SANDEEP SHINDE
Date: 2025.03.26 18:49:51 +05'30'

**(माधवी शिंदे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा.मंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. पणन संचालक, पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ, पुणे.
४. श्री. नारायण बाजीराव पाटील, सभापती, कृषि उत्पन्न बाजार समिती, दोंडाईचा, जि.धुळे.
५. निवडनस्ती (२१-स).